मौजे बाभुळगांव , (ता.पाथरी जि. परभणी ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः पापुयो - २०१६/प्र.क्र. १६१/पापु १८**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीख: ११ जानेवारी, २०१६**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्र.पापुयो-२०१६/प्र.क्र.१६१/पापु-१३,दिनांक २०/०९/२०१६.

२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नांदेड यांचे पत्र क्र.मजिप्रामंनां./तांशा.ना/१९०६/२०१६, दि. १६/१२/२०१६.

३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,परभणी यांचे पत्र क्र. जिपप/ग्रापुवि/तांशा/कावि/२६४७/२०१६, दि. २२/१२/२०१६.

**शासन शुध्दीपत्रक**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मौजे बाभुळगांव (ता.पाथरी जि.परभणी) या योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या रु.२,७८,३४,०४१/- (ढोबळ) इतक्या सुधारीत किंमतीस संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नांदेड यांनी तांत्रिक मान्यता दिलेली आहे. तथापि, सदर शासन निर्णयातील अट क्र.८ मध्ये सदर योजनेस कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांनी तांत्रिक मान्यता दिली असल्याचे नमूद केले आहे. **त्याऐवजी पुढील प्रमाणे वाचावे** "सदर योजनेस अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नांदेड यांनी संदर्भ क्र २ येथील पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिलेली आहे."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१११७२९०६८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar
Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.01.11 18:33:23 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)

३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

४) जिल्हाधिकारी, परभणी.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड.
१०) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
११) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.